राज्यात जल जीवन मिशन राबविण्यासाठी मार्गदर्शक सूचना.

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : जजमि २०१९/प्र.क्र.१३८ /पापु-१०(०७)**

जी. टी. हॉस्पिटल आवार, नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१

दिनांक : ०४ सप्टेंबर, २०२०

**वाचा:**

१. केंद्र शासनाच्या जल जीवन मिशनच्या कार्यरत मार्गदर्शक सूचना दि. २५.१२.२०१९
२. शासन निर्णय क्र. ग्रापापु-२०१८/प्र.क्र. ४०/पापु.-१० दि. ०७.०८.२०१८
३. शासन निर्णय क्र. ग्रापाधो-११०९/प्र.क्र. १०४(अ)/पापु.-०७ दि. १७.०३.२०१०
४. (शासन निर्णय क्र. ग्रापाधो-२०१८/प्र.क्र. १७१/पापु.-०७ दि. ११.०२.२०१९
५. शासन निर्णय क्र. ग्रापापु-२०१८/प्र.क्र. ४०/पापु.-१० दि. १६.०८.२०१९
६. शासन निर्णय क्र.जजीमि /०६२०/प्र.क्र. २०/पापु.-०७ दि. ३०.०६.२०२०

**प्रस्तावना:-**

सन २००९-१० पासून केंद्र शासन पुरस्कृत सुरु असलेला राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम जल जीवन मिशनमध्ये समाविष्ट करुन, पुनर्रचना करण्याचे केंद्र शासनाने ठरविले आहे. यानुसार ग्रामीण भागातील सर्व कुटुंबांना सन २०२४ पर्यंत “हर घर नल से जल” (FHTC-Functional Household Tap Connection) प्रमाणे पाणी पुरवठा करण्यास शासन कटिबध्द आहे. सन २०२४ पर्यंत राज्यातील ग्रामीण भागातील प्रत्येक घरात वैयक्तिक नळ जोडणीद्वारे दरडोई किमान ५५ लिटर प्रती दिन, गुणवत्तापूर्ण पाणी पुरवठा करणे हे जल जीवन मिशनचे प्रमुख उद्दिष्ट आहे.

या अंतर्गत प्रत्येक ग्रामीण व्यक्तीस, स्वयंपाकासाठी आणि घरगुती वापरासाठी शुद्ध व पुरेसा आणि शाश्वत पाणी पुरवठा सर्वकाळ आणि सर्व परिस्थितीत सोयीच्या ठिकाणी उपलब्ध करुन देणे हे उद्दिष्ट आहे. यात फक्त योजना पुर्ण करणे एवढाच ऊद्देश नसुन कार्यक्षम पाणी पुरवठ्याची एक शाश्वत सेवा उपलब्ध करणे हा त्यामधील प्रमुख गाभा आहे. केंद्र शासनाच्या कार्यरत मार्गदर्शक सुचनांनुसार जल जीवन मिशनची राज्यात अंमलबजावणी करणे आणि मिशन अधिकाधिक परिणामकारक होण्याकरिता सध्या अस्तित्वातील अंमलबजावणीसाठीच्या प्रचलित कार्य पध्दती व निकषांमध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

(१) राज्य मंत्रीमंडळाच्या दि. ८.०७.२०२० रोजी झालेल्या बैठकीत राज्यात केंद्र शासन प्रणित जल जीवन मिशन राबविण्यास मान्यता देण्यात आली आहे. यानुसार राज्यातील ग्रामीण भागातील प्रत्येक कुटुंबाला सन २०२४

पर्यंत, वैयक्तिक नळ जोडणीद्वारे दरडोई किमान ५५ लिटर प्रती दिन, गुणवत्तापूर्ण पाणी पुरवठा करण्याचे लक्ष्य आहे. सदर जल जीवन मिशन ५०:५० टक्के केंद्र व राज्य हिश्याने राबविण्यात येईल.

(२) **उद्दिष्ट** :

जल जीवन मिशनअंतर्गत, सन २०२४ पर्यन्त राज्याच्या ग्रामीण भागातील प्रत्येक कुटुंबास घरगुती कार्यात्मक नळ जोडणीव्दारे विहित गुणवत्तेचे पाणी प्रती माणसी प्रती दिन किमान ५५ लिटर या प्रमाणात उपलब्ध करुन देणे अपेक्षित आहे.

**(३) कृती आराखडा** :

३.१) जल जीवन मिशन अंतर्गत राज्यातील ग्रामीण भागातील प्रत्येक कुटुंबाला पिण्याच्या पाण्याची सुरक्षा (Drinking water security) देण्यासाठी प्रत्येक घरात कार्यात्मक नळ जोडणीव्दारे पिण्याच्या पाण्याचा पुरवठा करण्यात येणार आहे. पिण्याच्या पाण्याची गुणवत्ता ही किमान भारतीय दर्जा - BIS : १०५०० अशी असावी असे अपेक्षित केले आहे.

३.२) राज्यातील प्रत्येक घराला कार्यात्मक घरगुती नळ जोडणीव्दारे (Fuctional Household Tap Connections) पाणी पुरवठा करण्यासाठी बेस लाईन सर्वेक्षण करुन पुढील ४ वर्षाचे नियोजन करण्यात यावे.

३.३) जल जीवन मिशनअंतर्गत प्रत्येक कुटुबांस सन २०२४ पर्यंत घरगुती नळ जोडणीव्दारे पाणी पुरवठा सुविधा उपलब्ध करुन दयावयाची आहे. यानुसार गाव कृती आराखडा (VAP), जिल्हा कृती आराखडा (DAP) व राज्य कृती आराखडा (SAP) तयार करावा. सदर कृती आराखडयामध्ये दयावयाच्या नियोजित घरगुती नळ जोडण्याचे व त्याकरिता आवश्यक असणाऱ्या निधीचे त्रैमासिक व वार्षिक नियोजन यांचा समावेश असावा. गाव कृती आराखडा तयार करण्यासाठी अंमलबजावणी सहाय्य संस्था (ISA), ग्रामीण पाणी पुरवठा विभाग/उपविभाग किंवा महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांची मदत घेण्यात यावी.

(४) **जल जीवन मिशन अंतर्गत योजनांची अंमलबजावणी :**

जलजीवन मिशनमध्ये पुढील प्रकारच्या योजनांचा समावेश करावा.

४.१) ज्या योजना राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (NRDWP) अंतर्गत सुरु आहेत, अशा योजनांची सुधारणात्मक पुनर्जोडणी (Retrofitting) किमान ५५ LPCD प्रमाणे करून कार्यात्मक घरगुती नळ जोडणी करणे. तसेच ज्या गावांमध्ये स्टँड पोस्ट नळ पाणी पुरवठा योजना आहेत, अशा गावांमध्ये स्टँड पोस्टपासून प्रत्येक कुटुंबापर्यंत/घरापर्यंत घरगुती कार्यात्मक घरगुती नळजोडणी देण्यासाठी पूर्वीच्या योजनांची सुधारणात्मक पुनर्जोडणी (Retrofitting) करणे.

४.२) पूर्ण झालेल्या योजनांच्या बाबतीत ४० LPCD ऐवजी किमान ५५ LPCD पाणीपुरवठा करण्याच्या अनुषंगाने अशा योजनांची सुधारणात्मक पुनर्जोडणी (Retrofitting) करणे.

४.३) ज्या गावांमध्ये पिण्यायोग्य मुबलक भूजल (किंवा अन्य पर्यायाद्वारे) उपलब्ध आहे, अशा गावांमध्ये स्वतंत्र योजना घेणे.

४.४) ज्या गावांमध्ये मुबलक भूजल (किंवा अन्य पर्यायाद्वारे) पाणीसाठा उपलब्ध आहे, मात्र पाण्याची गुणवत्ता योग्य नाही, अशा गावांमध्ये जल शुद्धीकरणाच्या प्रकल्पासह स्वतंत्र योजना घेणे.

४.५) ज्या गावांमध्ये पाण्याचे प्रमाण कमी आहे, अशा गावांसाठी प्रादेशिक/ अनेक गाव योजना (Water Grid) घेणे.

४.६) आदिवासी भागात नळ पाणीपुरवठा सोय नसलेल्या आदिवासी गावे/ वाड्या/ पाडे यांना कायमस्वरुपी पाणी पुरवठा करून प्रत्येक घरात कार्यात्मक नळजोडणीद्वारे पाणी पुरवठा करणे , जल जीवन मिशनच्या मार्गदर्शक सूचनांनुसार शासकीय आश्रमशाळा, अनुदानित आश्रमशाळा, शासकीय वसतिगृहे, अंगणवाडी इत्यादी करिता सदर योजनेतून नळ जोडणी देणे. तसेच एकाकी/आदिवासी वाडी/पाड्यांकरीता सौर ऊर्जा आधारित नळ पाणी पुरवठा योजना राबविणे

४.७) दलित वस्तीमधील सर्व घरांना कार्यात्मक नळ जोडणीव्दारे पाणी पुरवठा देणे व योजनेच्या लाभार्थ्यांची स्वतंत्र माहिती ठेवणे.

( ५ ) **जल जीवन मिशनची नवीन अंमलबजावणी कार्यपद्धती** :

५.१) पाणीपुरवठा योजनांच्या विशिष्ट उपांगाचे (पाण्याची टाकी, पंप हाऊस ईत्यादी) संभाव्य संकल्प चित्र आराखडे व त्यांची अंदाजपत्रके (भौगोलिक क्षेत्र आणि तेथील भौगोलिक परिस्थितीनुसार) राज्य पाणी व स्वच्छता मिशनकडून तयार करुन उपलब्ध करुन देण्यात येतील. त्याप्रमाणे सर्व यंत्रणांनी या आराखडयानुसार पुढील कार्यवाही करावी.

५.२) पाणीपुरवठा योजनेसाठी लागणाऱ्या दर्जेदार (भारतीय मानांकनाप्रमाणे) बांधकाम व अभियांत्रिकी साहित्य/यंत्रसामुग्रीचा (पाईप, विद्युत पंप, वॉल्व्हस, सिमेंट, स्टील वगैरे) आवश्यकतेप्रमाणे दरकरार करणे /एजन्सी नेमणे ई. कार्यवाही राज्य पाणी व स्वच्छता मिशनद्वारे करण्यात येईल. या दरपत्रकावर आधारित अंदाजपत्रके व आराखडे सर्व यंत्रणांनी करावेत.

५.३) राज्य पाणी व स्वच्छता मिशनच्या कार्यकारी समितीमार्फत पाणीपुरवठा योजनांच्या जलद अंमलबजावणीसाठी मध्यवर्ती निविदा प्रक्रियेद्वारे नामांकित बांधकाम संस्था व पुरवठादार यांचे जिल्ह्यांसाठी पॅनेल तयार करण्यात येईल. जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन या पॅनेलमधून पाणीपुरवठा योजना करण्यासाठी एका योजनेकरीता एका संस्थेची निवड करेल. मात्र ग्राम पातळीवरील

योजनांसाठी अशी निवड करताना जिल्हा समिती, ग्राम पाणी समितीला विश्वासात घेऊन/ विचारविनिमय करुन अंमलबजावणी संस्थेची निवड करेल.

५.४) जिल्ह्यातील पाणीपुरवठा योजनांसाठी प्रशासकीय मान्यता देण्यासंदर्भात राज्य पाणी व स्वच्छता मिशनकडून जिल्हा पाणी व स्वच्छता मिशनला वित्तीय मर्यादेचे अधिकार प्रदान केले जातील.

५.५) पाणी पुरवठा योजनेच्या अंमलबजावणी दरम्यान आणि अंतिम देयक अदायगी करण्यापूर्वी जल जीवन मिशन च्या मार्गदर्शक सुचनांप्रमाणे त्रयस्थ संस्थेमार्फत तपासणी करण्यात येईल. राज्य पाणी व स्वच्छता मिशनच्या कार्यकारी समितीमार्फत नेमलेल्या त्रयस्थ तपासणी संस्थांचे पॅनेल मधील संस्थांमार्फत जिल्हा पाणी व स्वच्छता मिशनकडून या गावांच्या योजनांची त्रयस्थ तपासणी करण्यात येईल.

५.६) स्वतंत्र योजनेसाठी जास्तीत जास्त १८ महिन्यांचा व अनेक गाव योजनांसाठी ३६ महिन्यांचा कालावधी अनुज्ञेय राहिल. ज्या योजना पूर्ण करण्यास ३ वर्षांचा कालावधी लागणार आहे, अशा योजनांचे कार्यादेश/कार्यरंभ आदेश/करार (Contract) अंमलबजावणीकरिता मार्च २०२१ पूर्वी देण्यात यावेत. ज्या योजना पूर्ण करण्यास २ वर्षांचा कालावधी लागणार आहे, अशा योजनांचे कार्यादेश/ कार्यरंभ आदेश/करार (Contract) अंमलबजावणीकरिता मार्च २०२२ पूर्वी देण्यात यावेत, यानुसार गाव कृती आराखडा (VAP) व जिल्हा कृती आराखडा (DAP) तयार करण्यात यावा.

(६) **जल जीवन मिशनसाठी संस्थात्मक यंत्रणा** :

जल जीवन मिशनच्या मार्गदर्शक सूचना दिनांक २५.१२.२०१९ रोजी केंद्र शासनाने प्रसिध्द केल्या आहेत हा एक कालमर्यादित कार्यक्रम आहे. विहित कालावधीत उद्दीष्टपूर्ती करण्याचे लक्ष्य असल्याने यासाठी मजबूत चार स्तरीय संस्थात्मक संरचना तयार करण्यात आली आहे. ती अशी:-

१) राष्ट्रीय स्तरावर “राष्ट्रीय जल जीवन मिशन” (NJJM)

२) राज्य स्तरावर राज्य पाणी व स्वच्छता मिशन (SWSM )

३) जिल्हा स्तरावर जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन (DWSM)

४) ग्राम पातळीवर ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता समिती (VWSC).

याअनुषंगाने राज्यात खालीलप्रमाणे संस्थात्मक यंत्रणा निर्माण करण्यात येत आहेत.

**६.१. <u>राज्य पाणी व स्वच्छता मिशन ( SWSM )</u>**

६.१.१ पाणीपुरवठा व स्वच्छता विभागातील योजनांसाठी या विभागामार्फत दिनांक १०.०२.२०१० रोजी संस्था नोंदणी अधिनियम, १८६० अंतर्गत राज्य पाणी व स्वच्छता मिशनची नोंदणी करण्यात आली आहे. या मिशनमध्ये राज्याचे मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली शिखर समिती आहे. जल

जीवन मिशन व स्वच्छताविषयक कार्यक्रमांचे राज्यातील नियोजन, अंमलबजावणी, संनियंत्रण याबाबत संपूर्ण जबाबदारी व अधिकार राज्य पाणी व स्वच्छता मिशनला आहेत. जल जीवन मिशनच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे राज्य पाणी व स्वच्छता मिशनला कार्य करण्याचे संपूर्ण अधिकार आहेत. राज्य पाणी आणि स्वच्छता मिशनला (SWSM) जल जीवन मिशनसाठी कार्यान्वयन यंत्रणा म्हणून केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार कार्यवाही करण्यासाठी प्राधिकृत करण्यात येत आहे.

**६.१.२ राज्य पाणी व स्वच्छता मिशनसाठी मनुष्यबळ**

अ) भारतीय प्रशायकीय सेवा संवर्गातील सचिव दर्जाचे "जल जीवन मिशन संचालक" हे पद नव्याने निर्माण करण्यात येत आहे. मिशन संचालक हे राज्य पाणी व स्वच्छता मिशनच्या कार्यकारी समितीचे सदस्य सचिव व मिशन संचालक म्हणून काम करतील. शासन निर्णय क्र.ग्रापाधो/१११० प्र.क्र. १७८/पापु ०७ दिनांक १२ मार्च, २०१२ अन्वये पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेची (WSSO) स्थापना करण्यात आली होती. आता केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार ही संस्था राज्य पाणी व स्वच्छता मिशनमध्ये विलीन करण्यात येत आहे. या संस्थेमध्ये ३० पदे कंत्राटी पद्धतीने तर २६ पदे प्रतिनियुक्तीने भरण्यात आली आहेत.

सदर अस्तित्वात असलेली ५६ पदे कमी करुन व केंद्र शासनाच्या जल जीवन मिशनच्या मार्गदर्शक सूचना लक्षात घेऊन जल जीवन मिशन करीता एकूण ३९ पदे घेण्यात येणार असून ही प्रतिनियुक्तीने भरण्यात येतील. या प्रस्तावित ३९ पदांपैकी २६ प्रतिनियुक्तीची पदे सध्या (पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेममध्ये) मध्ये मंजूर असून त्याव्यतिरिक्त १३ पदे मिशनच्या कालावधीकरीता नव्याने निर्माण करण्यात आलेली आहेत. त्यांचा गोषवारा परिशिष्ट १ मध्ये देण्यात आला आहे. प्रतिनियुक्तीच्या पदांच्या वेतन व अनुषंगिक बाबींचा वार्षिक खर्च जल जीवन मिशनच्या मार्गदर्शक सूचनांनुसार राज्य शासनाला करावा लागणार असल्याने प्रतिनियुक्तीच्या पदांच्या वेतन व भत्यापोटी येणाऱ्या खर्चाकरीता राज्य हिश्याच्या निधीमध्ये आवश्यक ती वार्षिक तरतूद करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. तसेच जल जीवन मिशनच्या मार्गदर्शक सूचनांनुसार केंद्र शासनाने सूचविलेल्या मनुष्यबळाव्यतिरिक्त आवश्यकतेप्रमाणे अन्य मनुष्यबळ संस्थेस बाह्य संस्थेद्वारे उपलब्ध करुन घेता येईल. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार, मिशनच्या कालावधीत मिशनसाठी आवश्यक असलेली राज्य/जिल्हा/तालुका स्तरावरील पदे बाह्ययंत्रणेमार्फत भरण्यावावतचे अधिकार राज्य पाणी व स्वच्छता मिशनच्या शिखर समितीला प्रदान करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तथापि या पदावरील खर्च हा जलजीवन मिशन अंतर्गत प्राप्त होणा-या सहायकृत बाबींसाठी असलेल्या निधीच्या प्रमाणाच्या मर्यादेत राहणे आवश्यक राहील.

ब) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत विभागाच्या पातळीवर हाताळण्यात येणारे कामकाज/विषय राज्य पाणी व स्वच्छता मिशनमार्फत हाताळण्यात येणार असल्याने विभागातील संबंधित ४ कार्यासनांपैकी ३ कार्यासने मिशनअंतर्गत काम करतील. ही तीन कार्यासने ठरविण्याचा अधिकार विभागाच्या अप्पर मुख्य सचिवांना राहील. या तीन कार्यासनाअंतर्गत १ मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, १ अवर सचिव, ३ कक्ष अधिकारी, ३ सहायक कक्ष अधिकारी व ३ लिपिक याप्रमाणे अधिकारी/कर्मचारी हे मिशनअंतर्गत काम करतील. वरील अधिकारी/कर्मचाऱ्यांचे वेतन व अनुषंगिक भत्ते याबाबतची कार्यवाहीसद्य स्थितीप्रमाणे विभागाच्या आस्थापनेवरच होईल.

६.२ <u>जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन (DWSM)</u>

जिल्ह्यातील जल जीवन मिशनच्या संपूर्ण अंमलबजावणीसाठी जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन जबाबदार असेल. महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ च्या कलम ७९(अ) नुसार प्रत्येक जिल्हा परिषदेमध्ये स्थापन केलेल्या जिल्हा जल व्यवस्थापन व स्वच्छता समितीला जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन म्हणून कार्य करण्यास या विभागाच्या दिनांक ७.०९.२०११ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तथापि केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचना विचारात घेता जिल्हा पाणी व स्वच्छता मिशनची नव्याने खालीलप्रमाणे पुनर्रचना करण्यात येत आहे.

६.२.१ जिल्हा पाणी व स्वच्छता मिशनचे जिल्हाधिकारी हे अध्यक्ष असतील व संबंधित जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी हे सह अध्यक्ष असतील.

तसेच आरोग्य विभाग, शिक्षण विभाग, प्रकल्प संचालक, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, जलसंपदा विभाग, जलसंधारण विभाग, कृषी विभाग, वन विभाग, तसेच माहिती व जनसंपर्क या विभागाचे त्या जिल्हयाचे प्रमुख अधिकारी या मिशनचे सदस्य असतील. महाराष्ट्र जीवन प्राधिकरण व भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा यांचे जिल्ह्यातील प्रमुख अधिकारी हे या मिशनचे सदस्य असतील. पाणीव्यवस्थापन, समाजविकास, सामाजिक आरोग्य या क्षेत्रातील नामांकित व्यक्ती तसेच स्थानिक खासदार , आमदार यांना या मिशनवर मानद सदस्य म्हणून घेता येईल. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा हे या मिशनचे सदस्य सचिव असतील.

६.२.२ जल जीवन मिशन चे जिल्हास्तरीय आराखडे, जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन च्या मान्यतेनंतर, त्या जिल्हयाचे मा. पालकमंत्री यांच्या अध्यक्षतेखालील जिल्हास्तरीय समितीसमोर सादर करण्यात येतील. या समितीमध्ये त्या जिल्ह्यांमधील सर्व मंत्री, तसेच मा. पालकमंत्री यांनी नेमलेले ३ आमदार हे सदस्य असतील. या समितीच्या सहमती नंतर सदर आराखडे हे राज्य स्तरावरील समिती पुढे मान्यतेसाठी ठेवण्यात येतील. राज्यपातळीवर मा.मंत्री ( पाणीपुरवठा व स्वच्छता ), मा. राज्यमंत्री ( पाणीपुरवठा व

स्वच्छता ), अप्पर मुख्य सचिव ( पाणीपुरवठा व स्वच्छता )व मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांची समिति ( राज्यस्तरीय योजना मंजुरी समितीच्या मान्यतेनंतर) आराखड्यांना अंतिम मान्यता देईल.

६.२.३ जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन करीता मनुष्यबळ पुढीलप्रमाणे असेल:-

अ ) सध्या प्रत्येक जिल्हा परिषदेमध्ये कंत्राटी मनुष्यबळासह पाणी व स्वच्छता कक्ष कार्यरत आहे. या विभागाचा शासन निर्णय क्र.जस्वप्र-०२१४/प्र.क्र.३४/पापु-११, दिनांक १७.०२.२०१४ अन्वये या कक्षामध्ये १ उपमुख्य कार्यकारी अधिकारी, १ कार्यालय अधिक्षक, १ लेखाधिकारी, १ लिपिक याप्रमाणे प्रत्येक जिल्हयास ४ पदे याप्रमाणे राज्यातील ३४ जिल्हा परिषदांमध्ये एकूण १३६ पदे प्रतिनियुक्तीची आहेत. सध्या या पदांच्या वेतनावरील खर्च जलस्वराज्य टप्पा-२ मधून भागविला जातो. जल जीवन मिशनसाठी ही पदे आवश्यक असल्याने १ उपमुख्य कार्यकारी अधिकारी, १ लेखाधिकारी, १ कार्यालय अधीक्षक व १ लिपिक याप्रमाणे जिल्हा परिषद स्तरावर प्रत्येकी ४ पदे (एकूण १३६) जल जीवन मिशनसाठी पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे. उपमुख्य कार्यकारी अधिकारी ( पाणीपुरवठा व स्वच्छता ) हे जिल्हा प्रकल्प संचालक म्हणून काम पाहतील. या पदांच्या वेतन/भत्त्यापोटी येणारा वार्षिक खर्च जल जीवन मिशनच्या मार्गदर्शक सूचनांनुसार राज्य शासनाला करावा लागणार असल्याने प्रतिनियुक्तीच्या पदांच्या वेतन व भत्त्यापोटी येणाऱ्या आवश्यक त्या वार्षिक खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे.

ब) त्याच प्रमाणे जिल्हा स्तरावरील व तालुकास्तरावरील सद्य स्थितीत कार्यरत असलेले कार्यकारी अभियंता (ग्रामीण पाणीपुरवठा) आणि उपअभियंता (ग्रामीण पाणीपुरवठा) यांच्या आस्थापनेवरील एकूण अधिकारी/कर्मचारी हे जल जीवन मिशनचा भाग म्हणून काम करतील. वरील अधिकारी/कर्मचाऱ्यांचे वेतन व अनुषंगिक भत्ते सद्य स्थितीप्रमाणे विभागाच्या आस्थापनेवरच होईल.

क) जल जीवन मिशन अंतर्गत जिल्ह्यातील कामाची व्याप्ती विचारात घेऊन खालीलप्रमाणे मनुष्यबळ निर्माण करण्यात येत आहेत .

| | | |
|---|---|---|
| १.) प्रकल्प व्यवस्थापक- (तांत्रिक, आर्थिक, नियंत्रण) | - | ३ |
| २.) समन्वयक, माहिती, शिक्षण संवाद | - | १ |
| ३.) समन्वयक, मनुष्यबळ विकास बळकटीकरण व प्रशिक्षण | - | १ |
| ४.) समन्वयक, अंमलबजावणी सहाय संस्था | - | १ |
| ५.) समन्वयक, एकात्मिक माहीती विकास प्रणाली | - | १ |
| ६.) समन्वयक, पाणी गुणवत्ता | - | १ |
| **एकूण** | - | ८ |

तसेच जल जीवन मिशनच्या मार्गदर्शक सूचनांनुसार मिशनच्या कालावधीत ( जिल्हा/गट स्तरावर ) बाह्ययंत्रणेमार्फत आवश्यक मनुष्यबळ घेण्याचे अधि कार राज्य पाणी व स्वच्छता मिशनला असतील. मात्र त्याचा खर्च हा जलजीवन मिशन अंतर्गत प्राप्त होणा-या सहायकृत बाबींसाठी तरतुदीच्या प्रमाणाच्या मर्यादेत राहणे आवश्यक राहील.

**६.३ ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती (VWSC)-**

ग्रामपंचायत अधिनियम, १९५९ अंतर्गत स्थापित ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समितीचे पदसिद्ध अध्यक्ष सरपंच असून ग्रामसेवक पदसिद्ध सदस्य सचिव आहेत. ही समिती जल जीवन मिशनच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे कार्यान्वित नळजोडणीद्वारे पाणीपुरवठा करण्यासाठी योजनांचे नियोजन, अंमलबजावणी आणि देखभाल दुरुस्ती करेल. ग्राम पाणीपुरवठा व्यवस्थापनासाठी ग्रामपंचायत स्तरावर जल जीवन मिशन आणि सार्वजनिक वित्तिय व्यवस्थापन प्रणाली (PFMS) च्या मार्गदर्शक सुचनांनुसार बँक खाते असेल आणि जल जीवन मिशन आणि सार्वजनिक वित्तिय व्यवस्थापन प्रणाली (PFMS) च्या मार्गदर्शक सुचनां आणि ग्रामपंचायत लेखा संहितेनुसार त्याचे आर्थिक व्यवहार करण्यात येतील. ही समिती जल जीवन मिशनच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे काम करेल.

**<u>ग्राम पाणीपुरवठा समितीची कर्तव्ये व जबाबदाऱ्या ठळक बाबी पुढीलप्रमाणे आहेत:-</u>**

१) गावातील सर्व कुटुंबांना घरगुती नळ जोडणी देण्याची संपूर्ण जबाबदारी ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती ची असेल.

२) गाव कृती आराखडा तयार करणे, गावातील गाव अंतर्गत (In village) पाणीपुरवठा योजनांचे नियोजन, रचना, अंमलबजावणी, देखभाल-दुरुस्ती इ. ची जबाबदारी ही ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती ची असेल.

३) राज्य पाणी व स्वच्छता मिशनकडून मध्यवर्ती निविदा प्रक्रियेनुसार निवडण्यात आलेल्या संस्थांकडून/पुरवठादारांकडून बांधकाम सेवा/वस्तू/साहित्य प्राप्त करुन घेणे व त्या संस्थेकडून योजना राबवून घेणे.

४) त्रयस्थ संस्थेकडून होणाऱ्या योजनेच्या तपासणी व कार्यक्षमता मूल्यांकनाची व्यवस्था करणे.

५) योजनांचे सामाजिक लेखापरिक्षण हाती घेणे.

६) गावातील पाणीपुरवठा योजनेच्या पायाभूत सुविधाच्या भांडवली किमतीच्या ५% किंवा १०% लोकवर्गणी (आर्थिक/श्रमदान स्वरुपात) देण्याबाबत गावकऱ्यांना प्रोत्साहीत करणे. पाणीपट्टी आकारणे व वसुली करणे.

वरील ठळक बाबींसह केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनेप्रमाणे ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता समिती इतरही कामे करेल

(७) **अंमलबजावणी सहाय्य संस्था (ISA)** :

गावातील पाणी पुरवठा व स्वच्छता समितीला सहाय्य करण्यासाठी अंमलबजावणी सहाय्य संस्थांची (Implementation Support Agencies- ISA) महत्वाची भूमिका राहणार आहे. या संस्थेची निवड केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे राज्य पाणी व स्वच्छता मिशन करेल. ग्रामीण भागात प्रभावीपणे कार्यरत असणाऱ्या ग्रामीण संघटना (VO), महिला बचतगट (SHG), समुदाय आधारित संघटना (CBO), सार्जनिक विश्वस्त मंडळ (Charitable Trust) किंवा ग्रामीण भागात काम करणाऱ्या इतर पायाभूत संस्था यांची अंमलबजावणी सहाय्य संस्था (ISA) म्हणून निवड करण्यात येईल. राज्य पाणी व स्वच्छता मिशनने नियुक्त केलेल्या अंमलबजावणीची सहाय्य संस्था ( ISA ) कडून काम करुन घेण्याची जबाबदारी DWSM व SWSM ची आहे.

अमंलबजावणी सहाय्य यंत्रणेच्या (ISA- Implementing Support Agency) सहकार्याने प्रत्येक गावाचा “गाव कृती आराखडा” (VAP) तयार करण्याचे व अंमलबजावणी करण्याचे काम ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती करेल.

(८) **आर्थिक बाबी** :

या मिशनसाठी केंद्र व राज्य हिस्सा ५०:५० याप्रमाणे राहणार आहे. अनुसूचीत जाती/ जमातीच्या लोकसंख्येप्रमाणे निधी राखीव ठेवण्यात येईल. राज्यामध्ये जलजीवन मिशन राबविण्यासाठी एकूण रु.१३६६८.५० कोटी इतका अंदाजित खर्च अपेक्षित आहे. हे अंदाज ढोबळ मानाने काढण्यात आले असुन प्रत्यक्ष योजनेवरील खर्च त्या त्या योजनेच्या प्रशासकीय मान्यतेप्रमाणे खर्च करण्यात येईल.

उपरोक्त रकमेपैकी ५० टक्के हिस्सा व प्रतिनियुक्ती वरील पदांच्या वेतन व भत्त्यांसाठी आवश्यक निधी राज्य शासनाकडून अर्थसंकल्पित करण्यात येईल. सन २०२४ पर्यंत जल जीवन मिशन अंतर्गत देखील राज्याला ५० % हिस्सा उपलब्ध करून देणे अनिवार्य आहे. त्यामध्ये अनुसूचीत

जाती विशेष योजना व आदिवासी उपयोजना याकरीता निधीची तरतूद करण्यात येईल. याबाबतचे प्रस्ताव राज्य पाणी व स्वच्छता मिशन राज्य शासनास विहीत वेळेत सादर करेल.

एकूण निधीपैकी ५ टक्के निधी सहायकृत बाबींसाठी व २ टक्के निधी पाणी गुणवत्ता व सर्वेक्षण कार्यक्रमासाठी (पाणी नमुने प्रयोगशाळांमध्ये तपासणे व इतर अनुषंगिक बाबीसाठी ) राखीव असेल. राज्याने सन २०२४ पर्यंत प्रत्येक वर्षात देण्यात येणाऱ्या नळजोडण्यांची संख्या व त्यानुषंगाने येणारा खर्च यांची माहिती असणारा राज्य कृती आराखडा तयार करणे आवश्यक आहे.

राज्य पाणी व स्वच्छता मिशनकडून ग्रामपंचायतीला जल जीवन मिशन अंतर्गत आवश्यकतेप्रमाणे निधीची उपलब्धता करता येईल. यासाठी आमदार/खासदार (स्थानिक विकास कार्यक्रम) निधी, सीएसआर किंवा इतर सामाजिक संस्थामार्फत निधी उपलब्ध करता येईल. पाणीपुरवठा योजनांकरीता खासदार निधीतून प्राप्त रक्कम केंद्र हिस्सा म्हणून तर आमदार निधीतून प्राप्त रक्कम राज्याचा हिस्सा ग्राह्य धरली जाईल.

मिशन संचालक व मिशनमधील इतर अधिकारी यांच्या वित्तीय मर्यादा निश्चित करण्याचे अधिकार राज्य पाणी व स्वच्छता मिशनच्या शिखर समितीला राहतील.

जल जीवन मिशनच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी वेळेवर निविदा काढणे व ठराविक कालावधीत (१८ महिने) काम पूर्ण करण्यासाठी योग्य प्रशासकीय सुधारणा/ नवीन कार्यपद्धती याबाबत उपाययोजना करणे आवश्यक आहे. तसेच प्रशासकीय मान्यता देशील योग्य रितीने देणे आवश्यक आहे. केंद्र शासनाकडून भाववाढ/ सुधारित प्रशासकीय मान्यतेचा खर्च अनुज्ञेय नाही. त्यामुळे त्यासाठी खालीलप्रमाणे कार्यकारी /आढावा गट स्थापन करण्यात येत आहे.

१. अपर मुख्य सचिव (वित्त) - अध्यक्ष
२. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता)
३. अपर मुख्य सचिव (ग्रामविकास)
४. मिशन डायरेक्टर (जल जीवन मिशन)

हा कार्यकारी/आढावा गट वरीलप्रमाणे वेळोवेळी आढावा घेईल.

**(९) ग्रामपंचायतींचे १०% सामुदायिक योगदान** :

जल जीवन मिशन अंतर्गत गावामध्ये नव्याने पाणीपुरवठा योजना सुरु करण्यासाठी किमान ८० टक्के कुटुंबाकडून गावातील पायाभूत सुविधा प्रकल्पाच्या एकूण भांडवली खर्चापैकी १०% (डोंगराळ/वन भागामध्ये किमान ५% व अनुसूचित जाती/जमाती लोकसंख्या असलेल्या क्षेत्रासाठी किमान ५%) लोकवर्गणी गोळा होणे अनिवार्य आहे. ही वर्गणी जल जीवन मिशनच्या मार्गदर्शक तत्वानूसार रोख रकमेमध्ये किंवा श्रमदानाद्वारे अदा करता येईल. योजना पूर्ण झाल्यानंतर योजना

यशस्वीरित्या चालविणे आणि पाणीपट्टी वसुल करुन या योजनेची देखभाल दुरुस्ती योग्य रितीने करणाऱ्या ग्रामपंचायतीस पुढील ५ वर्षाच्या काळात टप्प्याटप्प्याने, जल जीवन मिशनच्या मार्गदर्शक तत्वानूसार, गावांतर्गत पाणीपुरवठा योजनेच्या पायाभूत प्रकल्पाच्या भांडवली खर्चाच्या १० % रक्कम प्रोत्साहनपर मिळेल.

**(१०) आर्थिक नियोजन व निधी व्यवस्थापन** :

१. जल जीवन योजना केंद्र व राज्य हिश्याने खालीलप्रमाणे राबविण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. जल जीवन मिशन अंतर्गत समाविष्ट घटक व उपघटक आणि त्यांचे निधीचे प्रमाण खालीलप्रमाणे आहे.

| अ. क्र. | घटक | केंद्र : राज्य निधीचे प्रमाण | अनुज्ञेय खर्चाच्याबाबी. |
|---|---|---|---|
| अ) | व्याप्ती (Coverage) म्हणजे हर घर नल से जल याबाबत पायाभूत सुविधांसाठी (ग्रामीण कुटुंबांना कार्यरत घरगुती नळजोडणी देण्याच्या दृष्टिने) | ५० : ५० | घरगुती नळजोडणी देण्याच्या दृष्टिने करण्यात येणाऱ्या पाणी पुरवठा योजनांचे बांधकाम. |
| | सहाय्यकृत बाबी (Support Activities) | ६० : ४० | माहिती, शिक्षण व संवाद, मनुष्यबळ विकास, प्रशिक्षण व कौशल्य विकास, माहिती केंद्र, त्रयस्थ तपासणी यंत्रणा, संसाधन केंद्र, स्थानिक समुदाय एकत्रिकरण, कार्यशाळा, आढावा बैठक, अभ्यासदौरा, IMIS संबंधित सुविधा, |
| | पाणी गुणवत्ता संनियंत्रण आणि सर्वेक्षण कार्यक्रम (WQM&S) | ६० : ४० | पाणी नमुने तपासणी, प्रयोगशाळा इत्यादी च्या अनुंषगिक बाबीं. |
| ब) | पाणी गुणवत्ता उपमिशन (NWQSM) | ५० : ५० | फ्लोराईडबाधित गावे/वाडयांच्या पाणी पुरवठा योजनांचे बांधकाम. |
| क) | प्रतिनियुक्तीवरील अधिकारी /कर्मचारी यांचे वेतन भत्ते | ० : १०० | राज्य हिस्सा |

३. गावांतर्गत पाणी पुरवठा योजनेच्या कामांसाठी घेण्यात येणारी लोकवर्गणी रोख रक्कम किंवा वस्तु किंवा श्रमदान या स्वरूपात घ्यावयाची आहे. यासाठी ग्रामपंचायत / ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समितीचे अध्यक्ष व सचिव यांचे संयुक्तिकरित्या स्वंतत्र बॅक खाते उघडण्यात यावे.

४. तसेच योजनेसाठी प्राप्त लोकवर्गणी व देखभाल दुरुस्तीसाठी केलेली पाणी पट्टी वसूली याबाबत स्वतंत्रपणे नोंदवही (Ledgers) ठेवण्यात यावी.

**(११) सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली ( PFMS ) :**

राज्य पाणी व स्वच्छता मिशन मार्फत एका अनुसूचीत /राष्ट्रीयीकृत बॅकेत वाणिज्य खाते उघडण्यात आले आहे त्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. केंद्र शासनाचा निधी राज्य शासनाच्या एकत्रित निधीमध्ये प्राप्त झाल्यानंतर तो राज्य हिश्यासह राज्य पाणी व स्वच्छता मिशनच्या केंद्रीभूत खात्यामध्ये १५ दिवसांत हस्तांतरीत करण्यात येईल. जल जीवन मिशनच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे आर्थिक व्यवहार व संनियंत्रण फक्त सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली ( PFMS ) प्रणालीद्वारे करण्यात यावा. यासंबंधी केंद्र शासनाकडून प्राप्त सुचनांनुसार कार्यवाही करणे बंधनकारक आहे.

तसेच केंद्र शासनाच्या एकात्मिक व्यवस्थापन माहीती प्रणाली (IMIS) नुसार भौतिक व आर्थिक प्रगतीचे संनियंत्रण आणि PFMS नुसार प्राप्त निधी व उपयोगिता याबाबत संनियंत्रण करण्यात येणार आहे.

(१२) **योजनांचे लेखापरिक्षण :**

राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांनी योजना पुर्ण झाल्यावर सहा महिन्यांच्या आत महालेखापाल याच्या निवडसूचीतील सनदी लेखापाल यांचेकडून लेखापरिक्षण केल्याची खात्री करावी. तसेच यासाठी अंमलबजावणी यंत्रणांच्या खात्याचे संकलित केलेले विवरणपत्र (Statement of Reconciliation with the account of implementing agency) आणि सनदी लेखापाल यांचे प्रमाणपत्र आवश्यक राहील. तसेच जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन यांनी प्रत्येक ग्राम पंचायत/ ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती यांचे खाते प्रत्येक आार्थिक वर्षाला लेखापरिक्षण होत असल्याची खात्री करावी. पाणी पुरवठा योजनांच्या कामांसाठी आगाऊ स्वरुपात रक्कम ग्रामपंचायत/ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती अथवा ठेकेदारास/बांधकाम साहित्य विक्रेत्यास अदा केली जाणार नाही.

योजनेच्या कामाच्या देयकानुसार व देयक अदा करण्यापूर्वी त्रयस्थ यंत्रणेमार्फत तपासणी केल्यांनतर देयक अदा करण्यात यावे. देयक अदा करण्यापुर्वी, IMIS वर नोंद घेण्यात यावी. त्याचा संदर्भ देयकावर लाल शाईने नोंदविण्यात यावा. अशी नोंद असलेले देयक वैध मानण्यात येईल. सदर देयक मान्यतेनंतर पीएफएमएस प्रणालीवर Expenditure टॅब खाली नोंदविण्यात यावे, जेणेकरून कंत्राटदारांना वा साहीत्य विक्रेत्यांच्या थेट बँक खात्यात रक्कम जमा होईल. या संबंधीची तपासणी जल जीवन मिशनच्या मार्गदर्शक तत्वानूसार करण्यात यावी. केंद्र शासनाच्या IMIS संकेतस्थळावर सदर देयकापोटी केलेल्या खर्चाची नोंद होत असल्याची खात्री वेळोवेळी करण्यात यावी.

**(१३) योजनांचे हस्तांतरण :**

पाणी पुरवठा योजना पूर्ण झाल्यानंतर व परिक्षण पुर्ण झाल्यावर खर्चाचे वित्तीय लेखापरिक्षण, करून योजना ग्रामपंचायतीस हस्तांतरण करण्यात यावी.

सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १५६ व्यय-३ दि. २५.०८.२०२० अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेस अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९०३१६४४५१२९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने.

Sanjay Chahande

Digitally signed by Sanjay Chahande
DN: c=IN, o=Government of maharashtra, ou=Water Supply & Sanitation dept, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=1bed10a58141847cce2660609247682836584568e524ed107d81092655e08eee,
serialNumber=17df548835856979dd20b49bd19b3f922c11a9955546b7989a245e6b2a9175e1, cn=Sanjay Chahande
Date: 2020.09.04 17:05:19 +05'30'

**( डॉ. संजय चहांदे )**
**अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा. मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री पाणीपुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. राज्यमंत्री पाणीपुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव मंत्रालय मुंबई
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा महाराष्ट्र विधिमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद महाराष्ट्र विधिमंडळ सचिवालय, मुंबई.
७. मा. विधानसभा विधानपरिषद सदस्य (सर्व) महाराष्ट्र विधिमंडळ सचिवालय, मुंबई.
८. मा. मुख्य सचिव महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव मंत्रालय, मुंबई.
९. मा. अपर मुख्य सचिव ( वित्त विभाग/ ग्राम विकास विभाग/ आदिवासी विकास विभाग /नियोजन विभाग/ सामाजिक न्याय विभाग/ पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) मंत्रालय, मुंबई.
१०. विभागीय आयुक्त (सर्व)
११. महालेखाकार, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१२. संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पुणे.
१३. जिल्हाधिकारी (सर्व)
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१५. सह/ उपसचिव / विशेष कार्य अधिकारी (सर्व) पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मुंबई
१६. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था बेलापूर, नवी मुंबई.
१७. मुख्य अभियंता/ अधीक्षक अभियंता प्रादेशिक विभाग /कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण ,(सर्व)
१८. उपमुख्य कार्यकारी अधिकारी, पाणी व स्वच्छता कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा जिल्हा परिषद, (सर्व)
१९. वरिष्ठ भूवैज्ञानिक भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा / सर्व अवर सचिव / कार्यासन अधिकारी (सर्व) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
२०. महालेखाकार, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
२१. निवड नस्ती (पापु ०७) कार्यासन, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

## जल जीवन मिशनच्या अंमलबजावणीकरिता पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेतील पदे व राज्य पाणी व स्वच्छता मिशन अंतर्गत प्रस्तावित पदांचे विवरण पत्र

### (परिशिष्ट-१)

| अ.क्र | जल जीवन मिशन अंतर्गत SWSM करीता प्रस्तावित पदे | नवीन पदे | अस्तित्वातील पदे | एकूण प्रतिनियुक्तीची पदे | वासोमधील पद | भरतीचे स्वरुप | संवर्ग | ७ व्या वेतन आयोगानुसार पे बँड |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | मिशन संचालक-भाप्रसे | १ | ० | १ | ------ | प्रतिनियुक्ती | भाप्रसे मधील सचिव दर्जा | S-३० |
| २ | प्रकल्प संचालक-जल जीवन मिशन | ० | १ | १ | संचालक | प्रतिनियुक्ती | महाराष्ट्र विकास सेवा | S-२५ |
| ३ | प्रकल्प संचालक-स्वच्छ भारत मिशन | १ | १ | १ | अति. संचालक | प्रतिनियुक्ती | महाराष्ट्र विकास सेवा | S-२५ |
| ४ | प्रकल्प संचालक-तांत्रिक (मुख्य अभियंता) | ० | ० | ० | मुख्य अभियंता | प्रतिनियुक्ती | मजीप्रा सदर पद नव्याने भरले जाणार नसून विभागातील मुख्य अभियंता व विशेष कार्य अधिकारी या पदावरील अधिकारी | S-२६ |
| ५ | प्रकल्प व्यवस्थापक-वित्त (सह संचालक लेखा) | १ | ० | १ | -- | प्रतिनियुक्ती | महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा | S-२५ |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ६ | प्रकल्प व्यवस्थापक-संनियंत्रण(जल जीवन मिशन) | १ | ० | १ | - | प्रतिनियुक्ती | महाराष्ट्र विकास सेवा/ समकक्ष संवर्ग | S-२३ |
| ७ | प्रकल्प व्यवस्थापक-संनियंत्रण(स्वच्छ भारत मिशन) | १ | ० | १ | -- | प्रतिनियुक्ती | महाराष्ट्र विकास सेवा/ समकक्ष संवर्ग | S-२३ |
| ८ | उपव्यवस्थापक-ISA | ० | १ | १ | राज्य समन्वयक | प्रतिनियुक्ती | महाराष्ट्र विकास सेवा/ समकक्ष संवर्ग | S-२०/S-१६ |
| ९ | उपव्यवस्थापक-माहिती शिक्षण व संवाद | ० | १ | १ | माहिती, शिक्षण व संवाद सल्लागार | प्रतिनियुक्ती | माहिती व जनसंपर्क विभाग | S-२०/S-१६ |
| १० | उपव्यवस्थापक-मनुष्यबळ विकास | ० | १ | १ | मनुष्यबळ विकास सल्लागार | प्रतिनियुक्ती | महाराष्ट्र विकास सेवा/ समकक्ष संवर्ग | S-२०/S-१६ |
| ११ | उपव्यवस्थापक-माहिती शिक्षण व संवाद | ० | १ | १ | पाणी गुणवत्ता सल्लागार | प्रतिनियुक्ती | भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा | S-२०/S-१६ |
| १२ | उपव्यवस्थापक-IMIS | ० | १ | १ | संनियंत्रण व मुल्यमापन सल्लागार | प्रतिनियुक्ती | अर्थ व सांख्यिकी संचालनालय | S-१६ |
| १३ | स्वच्छता व आरोग्य सल्लागार | ० | १ | १ | स्वच्छता व आरोग्य सल्लागार | प्रतिनियुक्ती | सार्वजनिक आरोग्य विभाग | s-१६ |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १४ | भूजल तज्ञ | ० | १ | १ | भूजल तज्ञ | प्रतिनियुक्ती | भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा | s-२० |
| १५ | उप अभियंता | ० | २च | २ | उप अभियंता | प्रतिनियुक्ती | महाराष्ट्र जीवन प्राधिकरण/जिल्हा परिषद पाणी पुरवठा विभाग | s-२० |
| १६ | शाखा अभियंता | १ | ५ | ६ | ३ शाखा अभियंता २ पदे JS-II | प्रतिनियुक्ती | महाराष्ट्र जीवन प्राधिकरण/जिल्हा परिषद पाणी पुरवठा विभाग | s-१४/S-१५ |
| १७ | कार्यकारी अभियंता ( सांडपाणी व घनकचरा) | ० | १ | १ | कार्यकारी अभियंता | प्रतिनियुक्ती | मजीप्रा | s-२३ |
| १८ | कार्यकारी अभियंता (पाणी व गुणवत्ता) | ० | १ | १ | अभियांत्रिकी तज्ञ- पाणी गुणवत्ता | प्रतिनियुक्ती | | S-२३ |
| १९ | लेखाधिकारी-NRDWP&SBM | १ | २ | ३ | लेखाधिकारी | प्रतिनियुक्ती | महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा, वर्ग-२ | S-१६ |
| २० | उपलेखापाल | ३ | १ | ४ | उपलेखापाल | प्रतिनियुक्ती | महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा | S-१३ |
| २१ | सहाय्यक | ४ | ० | ४ | ---- | प्रतिनियुक्ती | समकक्ष वेतनश्रेणी मंत्रालयीन संवर्ग | S-१३ |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २२ | लिपीक | ० | ३ | ३ | वरिष्ठ व कनिष्ठ लिपीक | प्रतिनियुक्ती | समकक्ष वेतनश्रेणी मंत्रालयीन संवर्ग/महाराष्ट्र विकास सेवा/महाराष्ट्र जीवन प्राधिकरण | S-८ |
| २३ | शिपाई | ० | २ | २ | शिपाई | प्रतिनियुक्ती | समकक्ष वेतनश्रेणी मंत्रालयीन संवर्ग/महाराष्ट्र विकास सेवा/महाराष्ट्र जीवन प्राधिकरण | S-३/S-४ |
| | | १३ | २६ | ३९ | | | | |

सध्या वासोमध्ये असलेले मुख्य अभियंता हे पद व्यपगत करुन विभागाच्या आस्थापनेवर असलेले मुख्य अभियंता तथा विशेष कार्यकारी अधिकारी या पदावरील SWSM मध्ये प्रकल्प संचालक या पदावर कार्यरत राहील व त्याचे वेतन सध्याप्रमाणे विभागाच्या आस्थापनेवर होईल

उपरोक्त पदे प्रतिनियुक्तीने भरण्यास प्राधान्य देण्यात येईल. प्रतिनियुक्तीद्वारे पदे उपलब्ध न झाल्यास सेवानिवृत्ती व बाह्ययंत्रणेद्वारे पदे भरण्यात येतील.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| सध्याची प्रतिनियुक्तीची पदे | २६ | | | एकूण पदे | वेतनापोटी वार्षिक रक्कम रू. |
| नव्याने प्रतिनियुक्तीची पदे | १३ | | | ३९ | ४७५९२७४४ |

## जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत प्रस्तावित पदांची माहिती परिशिष्ट-२

| अ. क्र. | जल जीवन मिशन अंतर्गत प्रस्तावित पदे | नव्याने निर्माण करावयाची पदे | | एकूण पदे | जिल्हास्तरावरील सद्यस्थितीतील DWSM कक्षातील पदे | भरतीचा प्रकार | या पूर्वीच्या पदनिर्मितीचा शासन निर्णय | संवर्ग | ६ व्या वेतन आयोगानुसार ग्रेड पे | ७ व्या वेतन आयोगानुसार वेतन बँड | वार्षिक खर्च |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | नवीन पदे | अस्तित्वातील पदे | | | | | | | | |
| १ | प्रकल्प संचालक | ० | १ | ३४ | उपमुख्य कार्यकारी अधिकारी | प्रतिनियुक्ती | शासन निर्णय क्र. जस्वप्र-०२१४/प्र.क्र. ३४/पापु-११,१७ फेब्रुवारी, २०१४ | महाराष्ट्र विकास सेवा | ५४०० | एस-२० | २९००८८०० |
| २ | प्रकल्प व्यवस्थापन (आर्थिक) | ० | १ | ३४ | लेखाधिकारी | प्रतिनियुक्ती | | महाराष्ट्र अर्थ व सांख्यिकी सेवा वर्ग-२ | ४४०० | | १६३२०००० |
| ३ | कनिष्ठ प्रशासकीय अधिकारी | ० | १ | ३४ | कार्यालय अधीक्षक | प्रतिनियुक्ती | | जिल्हा परिषद जिल्हा सेवा वर्ग-३ लिपीका वर्गीय श्रेणी-२ | ४२०० | एस-१३ | १६३२०००० |
| ४ | लिपिक | ० | १ | ३४ | लिपीक | प्रतिनियुक्ती | | समकक्ष वेतनश्रेणी | १९०० | | १४२८०००० |
| | एकूण | | ४ | १३६ | | | | | | | ७५९२८८०० |